**प्रशासकीय मान्यता**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांना आवश्यक यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : यंसाख-२०२०/प्र.क्र.४९/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ३० जानेवारी, २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/यंसाख/प्रस्ताव (Non-merged) ( भाग-५) / ४२१० १६२९/१०४४ /३-म /२०२०, दि.२८.०१.२०२०

**शासन निर्णय :-**

विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रुग्णालयांमध्ये गोंदिया व चंद्रपूर या संस्थांना राज्य योजनेंतर्गत (४२१० १६२९) या लेखाशीर्षाअंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीतून यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्याकरीता रुपये ३,८५,९७,२९४/- (रुपये तीन कोटी पंचाऐंशी लक्ष सत्त्याण्णव हजार दोनशे चौऱ्याण्णव फक्त) इतक्या रक्कमेची **परिशिष्ट " अ "** मध्ये नमूद केलेल्या संस्थांच्या नावासमोरील तपशीलानुसार या शासननिर्णयान्वये पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून एकत्रितरित्या प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | यंत्रसामुग्री प्रस्तावित किंमत |
|---|---|---|
| १ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया | २६०३२२९४ |
| २ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर | १२५६५००० |
| एकूण | | ३,८५,९७,२९४ |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता संबंधित संस्थेस संबंधित लेखाशीर्षाखाली यंत्रसामुग्रीपरत्वे मंजूर असलेल्या निधीतून प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त कोणतीही यंत्रसामुग्री हाताळण्यासाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नसून ती संस्थेत असलेल्या विद्यमान अधिकारी/कर्मचारी यांचेकडून सदर यंत्रसामुग्रीची हाताळणी करण्यात यावी. तसेच सदर यंत्रसामुग्री कोणत्याही परिस्थितीत बंद अवस्थेत वा विनावापर पडून राहणार नाही याची खबरदारी संबधित अधिष्ठाता यांनी घ्यावी.

३. सदर विषयी " शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका " याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया " औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. मार्फत करण्याबाबत " निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०.उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ " किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा " या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे संबंधित खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या यंत्रसामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

(सर्व संस्थांसांठी सामाईक लेखाशीर्ष)
मागणी क्र -एस ४ राज्ययोजना

| | |
|---|---|
| ४२१० | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च |
| ०३ | वैद्यकिय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | विषमचिकित्सा |
| (००) (३७) | शासकीय वैद्यक महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढकरणे (कार्यक्रम) (४२१० १६२९) |
| ५२ | यंत्रसामुग्री व साधन सामुग्री |

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३०१७२४५७५३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत : परिशिष्ट "अ"**

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.30 18:23:31 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
८. निवडनस्ती (प्रशा-१).

**शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक यंसाख-२०२०/प्र.क्र.४९/प्रशा-१, दिनांक : ३० जानेवारी, २०२० सोबतचे "परिशिष्ट अ"**

**यंत्रसामुग्री खरेदीबाबतचा तपशील**

| अ. क्र. | संस्थेचे नांव | यंत्राचे नांव | नग संख्या | प्रती नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया | इसीजी मशिन | १ | ४४८०० | ४४८०० |
| | | पायझो अल्ट्रासोनिक स्कॅलर | १ | ४५००० | ४५००० |
| | | एन्डो डोन्टीक एन्डोमीटर | १ | ५८००० | ५८००० |
| | | एन्डो डोन्टीक ॲपेक्स लॉकेटर | १ | ६०००० | ६०००० |
| | | टी-पीस रिसस्कीटेटर | २ | ७२८०० | १४५६०० |
| | | एक्स-रेमशिन (पोर्टेबल) | १ | १५१२०० | १५१२०० |
| | | ड्रग ट्रॉली ५० बिन | ३ | ७८००० | २३४००० |
| | | इन्ट्राओरल डिजीटल ईमेजिंग सिस्टिम विद एचपी डेस्कटॉप ॲण्ड प्रिंटर | १ | २६०१३३ | २६०१३३ |
| | | इन्ट्राओरल एक्स-रे सिस्टिम फॉर डेन्टल युनिट | १ | २७५००० | २७५००० |
| | | सीबीसी मशीन ३ पार्ट | १ | २९६८०० | २९६८०० |
| | | एबीजी मशिन | १ | ५०४००० | ५०४००० |
| | | कॉटरी इलेक्ट्रॉसर्जिकल युनिट विद अक्सेसरीज | १ | ५६०००० | ५६०००० |
| | | पेशन्ट रिटर्न इलेक्ट्रॉड कुशन्ड प्लेट | २ | २८९३२३ | ५७८६४६ |
| | | पल्स ऑक्सिमीटर | १५ | ५६००० | ८४०००० |
| | | ऑटोमेटेड ब्लड कल्चर सिस्टिम | १ | १०६२००० | १०६२००० |
| | | हिटेड ह्युमिडीफाईड हाय फ्लो नसल कॅन्यूला थेरपी डिव्हाईस | ५ | २९१२०० | १४५६००० |
| | | इंम्पीडन्स मेजरमेन्ट सिस्टीम | १ | १४९०००० | १४९०००० |
| | | ऑटोमेटेड आयडेंन्टिफीकेशन ॲण्ड ससेप्टीबीलीटी टेस्टींग सिस्टिम | १ | १५४८७५० | १५४८७५० |

| अ. क्र. | संस्थेचे नांव | यंत्राचे नांव | नग संख्या | प्रती नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| | | मल्टीपॅरा मॉनिटर फॉर आयसीयु विद मायनर टर्न कि वर्क | ५ | ३५०००० | १७५०००० |
| | | फुल्ली ऑटोमेटेड एलाईजा अॅण्ड आयएफए प्रोसेसर | १ | २०००००० | २०००००० |
| | | कार्डीओरेस्पीरेटरी अॅनेलाईजर सिस्टिम | १ | ३७००००० | ३७००००० |
| | | ३ डीलॅप्रोस्कोपी सिस्टीम विद ऑल ॲक्सेसरीज | १ | ८९७२३६५ | ८९७२३६५ |
| २ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर | ४ के टेलिस्कॉप अल्ट्रा ४ एमएम, ० डिग्री | १ | ३४५००० | ३४५००० |
| | | हाय डेफिनेशन एलसीडी मॉनिटर | १ | ५९५००० | ५९५००० |
| | | एच ५६० | १ | ६२५००० | ६२५००० |
| | | स्टॅटीक युनिट ६०० एम.ए. | १ | २५००००० | २५००००० |
| | | सर्जिकल ऑपरेटींग मायक्रोस्कोप फॉर ऑफ्थॅमोलॉजी | १ | ८५००००० | ८५००००० |
| | | एकूण | | | ३८५९७२९४ |